


**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दूरध्वनी क्रमांक-२२७९४२५७ Email ID : Desk 14b.gad-mh@gov.in

.......................................................................................................................

क्रमांक : कअनि-११२२/प्र.क्र.२१/१४-ब दिनांक : १० फेब्रुवारी २०२२

प्रति,
सह/उप सचिव (आस्थापना)
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

**विषय :** मृद व जलसंधारण विभागाच्या अधिपत्याखालील आयुक्तालय, मृद व जलसंधारण विभाग, औरंगाबाद या कार्यालयातील "प्रशासकीय अधिकारी" हे एक पद मंत्रालयीन संवर्गातील कक्ष अधिकाऱ्यांमधून प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत.

**संदर्भ :** सा.प्र.वि.शा.नि.क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१२०/कार्या-१४, दि.३१.०८.२०१७

महोदय/महोदया,

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत कार्यपध्दती विहीत करण्यात आली आहे. सदर कार्यपध्दतीनुसार मृद व जलसंधारण विभागाच्या अधिपत्याखालील आयुक्तालय, मृद व जलसंधारण विभाग, औरंगाबाद या कार्यालयातील "प्रशासकीय अधिकारी" हे एक पद मंत्रालयीन कक्ष अधिकारी संवर्गातून प्रतिनियुक्तीने भरावयाचे आहे. या पदाकरिता मंत्रालयीन विभागातील कक्ष अधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांकडून इच्छुकता मागविण्यात येत आहे.

२. उपरोक्त नमूद पद हे फक्त मंत्रालयीन संवर्गातील कक्ष अधिकाऱ्यांमधून प्रतिनियुक्तीने भरावयाचे असल्याने क्षेत्रिय कार्यालयातील अधिकाऱ्यांनी या पदाकरिता अर्ज सादर करु नयेत व असे अर्ज सादर करण्यात आल्यास ते विचारात घेतले जाणार नाहीत, तसेच त्याबाबत संबंधीतांस काहीही उत्तर कळविण्यात येणार नाही.

३. उपरोक्त पदासाठी प्रतिनियुक्तीवर जाण्यास इच्छुक असलेल्या मंत्रालयीन संवर्गातील कक्ष अधिकाऱ्यांनी परस्पर या विभागाकडे अर्ज सादर करु नयेत. <u>त्यांनी आपआपल्या विभागामार्फत अर्ज सादर करावेत.</u> परस्पर अर्ज सादर केल्यास त्या अर्जांचा विचार करण्यात येणार नाही व त्याबाबत संबंधितांस काहीही उत्तर कळविण्यात येणार नाही.

४. संबंधीत मंत्रालयीन विभागांनी उपरोक्त पदासाठी इच्छुकता दर्शविलेल्या कक्ष अधिकाऱ्यांचे अर्ज/प्रस्ताव सदर पत्रासोबत जोडलेल्या विहीत विवरणपत्रातील परिपूर्ण माहितीसह या विभागाकडे सादर

करावेत. तसेच त्यासोबत मागील ५ वर्षांच्या गोपनीय अहवालाच्या प्रतीदेखील सादर कराव्यात. इच्छुक कक्ष अधिकाऱ्यांचा प्रस्ताव दि.२५.०२.२०२२ पर्यंत पाठविण्यात यावा. उक्त पदासाठी दर्शविण्यात आलेली इच्छुकता परत मागे घेता येणार नाही. तसेच कोणीही कक्ष अधिकारी इच्छुक नसल्यास तसेही कळविण्यात यावे.

५. सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०२१०१७२४४४४५०७ असा आहे. सदर पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

**आपला,**

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2022.02.10 17:27:25 +05'30'

**(ग.भि.गुरव)**

**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**सहपत्र : विहीत विवरणपत्र**

प्रत :- निवड नस्ती, साप्रवि/का.१४ब

## प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यासंदर्भात विहीत करण्यात आलेले विवरणपत्र

<table>
<tr><td>१</td><td>अधिकाऱ्याचे संपूर्ण नांव</td><td colspan="2"></td></tr>
<tr><td>२</td><td>पदनाम/सध्या घेत असलेली वेतनश्रेणी</td><td colspan="2"></td></tr>
<tr><td>३</td><td>सध्याच्या कार्यालयाचे नाव, पत्ता व दूरध्वनी क्रमांक</td><td colspan="2"></td></tr>
<tr><td>४</td><td>जन्मदिनांक</td><td colspan="2"></td></tr>
<tr><td>५</td><td>शैक्षणिक अर्हता</td><td colspan="2"></td></tr>
<tr><td>६</td><td>भ्रमणध्वनी क्रमांक</td><td colspan="2"></td></tr>
<tr><td>७</td><td>ज्या पदावर प्रतिनियुक्तीने जाण्यास इच्छुक आहे ते पद</td><td colspan="2"></td></tr>
<tr><td>८</td><td>मागील ५ वर्षांच्या गोपनीय अहवालाच्या छायाप्रती<br>(मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत)</td><td colspan="2"></td></tr>
<tr><td>९</td><td>५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का?<br>(लागू असल्यास)</td><td colspan="2"></td></tr>
<tr><td>१०</td><td>मत्ता व दायित्वे सादर केली आहेत काय?</td><td colspan="2"></td></tr>
<tr><td rowspan="4">११</td><td rowspan="4">संबंधीत अधिकाऱ्यांस यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास तपशिल (पद व कालावधी) (प्रतिनियुक्तीचा एकूण कालावधी १० वर्षांपेक्षा जास्त नसावा)</td><td>दिनांकपासून ते दिनांकापर्यंत</td><td rowspan="3">पद/प्रतिनियुक्तीचे ठिकाण</td></tr>
<tr><td></td></tr>
<tr><td></td></tr>
<tr><td colspan="2">एकूण कालावधी</td></tr>
<tr><td>१२</td><td>मागील प्रतिनियुक्तीवरुन परत आल्याच्या दिनांकापासून ३ वर्षे पूर्ण झाली आहेत का?</td><td colspan="2"></td></tr>
<tr><td>१३</td><td>संबंधीत अधिकाऱ्यांविरुध्द विभागीय चौकशी सुरु अथवा प्रस्तावित आहे किंवा कसे? तसेच त्यांच्याविरुध्द लाचलुचपत गुन्ह्यासंदर्भातील प्रकरण, फौजदारी प्रकरण प्रलंबित आहे किंवा कसे,</td><td colspan="2"></td></tr>
<tr><td>१४</td><td>संबंधीत अधिकाऱ्याची निवड झाल्यास त्यास तात्काळ कार्यमुक्त करण्यात येईल किंवा कसे.</td><td colspan="2"></td></tr>
</table>

*****